**राज्यातील शासकीय अनिवासी क्रीडा प्रबोधिनी / क्रीडा अकादमींना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करणेबाबत- लेखाशिर्ष (२२०४-५३९५)**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-३०२५/प्र.क्र.३५/क्रीयुसे-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च २०२५

**वाचा :-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.क्रीडायो-३११३/प्र.क्र.४५/१३/क्रीयुसे-३, दिनांक २१ सप्टेंबर, २०१३.
२. सहसंचालक,क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र: शिक्रीपी/अनिवासी/निमा/२०२४-२५/का-११/११९१, दिनांक १४ फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यात शारिरीक शिक्षण व क्रीडा शिक्षणाचा दर्जा उंचविण्यासाठी, क्रीडा /क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्याचा पहिला टप्पा म्हणून पुणे येथील शिवछत्रपती क्रीडानगरी येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व राज्यातील वेगवेगळया ठिकाणी क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्यास संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. सद्य:स्थितीत राज्यात निवासी व अनिवासी शासकीय क्रीडा प्रबोधिनी कार्यान्वित आहेत.

या क्रीडा प्रबोधिनींमध्ये प्रशिक्षण घेत असलेल्या अनिवासी प्रशिक्षणार्थींना आहारभत्ता, दैनंदिन भत्ता, स्पर्धा सहभागासाठीचा खर्च, क्रीडा गणवेश व क्रीडा साहित्य व अन्य विहीत बाबींकरिता शासनाद्वारे अनुदान उपलब्ध करुन देण्यात येते. तसेच, क्रीडा प्रबोधिनीच्या दैनंदिन देखभाल व दुरुस्तीसाठी शासनामार्फत निधी उपलब्ध करुन देण्यात येतो.

क्रीडा व युवक सेवा, संचालयनालय पुणे यांनी उपरोक्त संदर्भ क्र.२ अन्वये सदर अनिवासी शासकीय क्रीडा प्रबोधिनी/ अकादमींमध्ये प्रशिक्षण घेत असलेल्या प्रशिक्षणार्थींच्या खर्चासाठी निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. याअनुषंगाने राज्यातील अनिवासी शासकीय क्रीडा प्रबोधिनी/ क्रीडा अकादमींना सन २०२४-२५ या चालू आर्थिक वर्षासाठी खर्चाकरिता निधी उपलब्धतेनुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील पुणे, अमरावती, अकोला, नागपूर, ठाणे या शासकीय अनिवासी क्रीडा प्रबोधिनी/ क्रीडा अकादमी यांना आर्थिक वर्ष २०२४-२५ साठी या क्रीडा प्रबोधिनींमध्ये प्रशिक्षण घेत असलेल्या अनिवासी प्रशिक्षणार्थींना आहारभत्ता, दैनंदिन भत्ता, स्पर्धा सहभागासाठीचा खर्च, क्रीडा गणवेश व क्रीडा साहित्य व अन्य विहीत बाबींकरिता रु.५०.०० लक्ष अनुदान उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. उपरोक्त वितरीत निधी सन २०२४-२५ साठी, मागणी क्रमांक ई-३, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (३३)(०२), जिल्हा स्तरावर बिगरनिवासी क्रीडा अकादमी स्थापन करणे (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२०४-५३९५) याखाली चालू आर्थिक वर्षासाठी उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. याकरीता अनिवासी क्रीडा प्रबोधिनी पुणे करिता लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, मुख्यालय, पुणे तर ठाणे , अकोला, करिता संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी व अमरावती व नागपूर करिता संबधित विभागीय क्रीडा उपसंचालक यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. क्रीडा व युवक सेवा, संचालनालय, पुणे यांनी संदर्भ क्र.२ अन्वये निधी मागणी केलेल्या प्रस्तावामधील बाबींपैकी प्रशिक्षणार्थीसाठी आवश्यक असणारे क्रीडा साहित्य खरेदी संदर्भात उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दि.०१.१२.२०१६ व दि.०६.०१.२०२० मधील तरतूदी व कार्यपध्दतीनुसार खरेदीची कार्यवाही करणे आवश्यक राहील.

५. अर्थसंकल्प अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी वित्त विभागाच्या दिनांक १२/२/२०२५ व १७/३/२०२५ च्या निधी वितरणाच्या परिपत्रकात नमूद सूचनांची पूर्तता होत असल्याचे तसेच याबाबींकरीता दुबार निधी वितरण होणार नाही, याबाबत आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रण अधिकारी यांनी खात्री करुन त्यानंतरच निधी आहरीत करावा. तसेच निधी ज्या बाबींसाठी वितरीत केला आहे त्याच बाबींसाठी निधी विनियोग करण्यात यावा. वितरीत केलेल्या निधीच्या विनियोगाबाबत आवश्यक उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

६. उपरोक्त मंजूर निधीतून खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेतील तरतूदी व व अनिवासी क्रीडा प्रबोधिनीच्या धोरणात्मक तरतुदी व संबंधित शासन निर्णयातील अटी/शर्तीचे पालन करणे आवश्यक राहील.

७. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१६७/१४७१, दिनांक ४/३/२०२५ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३४१/व्यय-५, दिनांक १८/३/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१३१५२७२६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.27 13:16:15 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपालाचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई

३. मा.उपमुख्यमंत्री ( नगर विकास व गृहनिर्माण ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७. सर्व सन्मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, (अ.का.) क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
९. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१०. मा. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
११. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. संबंधित जिल्हा कोषगार अधिकारी,
१३. संबंधित वरीष्ठ कोषागार अधिकारी,
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१५. नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१६. विभागीय क्रीडा उपसंचालक, अमरावती नागपूर
१७. जिल्हा क्रीडा क्रीडा अधिकारी, अकोला ठाणे
१८. प्राचार्य ,अनिवासी क्रीडा संकुल , पुणे,नागपूर, ठाणे, अमरावती, अकोला,
१९. अवर सचिव, अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती (क्रीयुसे-१).